**मा. उच्च न्यायालय मुंबई यांचे आदेशानुसार पुणे जिल्ह्यातील पुनर्वसनाची सद्यस्थिती, अडचणी व त्यामागच्या कारणमिमांसेची निश्चिती करणे आणि उपाय योजना सुचविण्यासाठी समिती गठीत करणेबाबत**

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः आरपीए/३४१५/प्र.क्र.६८/र-४**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक

मंत्रालय, मुंबई-४०००३२

तारीख: २९ ऑगस्ट, २०१५

<u>प्रस्तावना:-</u>

मा. उच्च न्यायालयाने रिट याचिका क्रमांक ७७९६/२०१३ (श्री. बासु राणु बुरुड विरुध्द महाराष्ट्र शासन व इतर) व त्यासोबत सुनावणीस घेतलेल्या इतर याचिकांसंदर्भात दिनांक ०२/०९/१०१३ रोजी आदेश पारीत केले होते. सदर आदेशात मा. उच्च न्यायालयाने " The Chief Secretary is directed to appoint a Committee of two person who are of level of the Commissioner and were not from Pune district to make an inquiry and find out why, and under what circumsntances, the farmers have not been rehabilitated. The Chief Secretary is also directed to set up a machinery to ensure that the provisions of the said Act are followed. The Petitioners may make a separate representation to the Committee, which is appointed by the Chief Secretary, and the said Committee shall take into consideration the representations and ensure that the Petitioners, who are entitled to get an alternate land, should get the land within ४ weeks from today." असे निर्देश दिले होते.

तद्नंतर, मा. उच्च न्यायालयाने रिट याचिका क्रमांक ७७९६/२०१३ व त्यासोबत सुनावणीस घेतलेल्या इतर याचिकांसंदर्भात दिनांक ०२/०९/१०१३ रोजी पारीत केलेल्या आदेशांबाबत शासनाकडुन सिव्हील ॲप्लीकेशन फॉर मॉडीफिकेशन दाखल करण्यात आले असुन ते न्यायप्रविष्ठ आहे.

याशिवाय मा. उच्च न्यायालयाने पर्यायी जमीन वाटपाच्या अनुषंगानेच दाखल करण्यात आलेल्या जनहित याचिका क्रमांक १७१/२०१४ मध्ये दिनांक २५/०८/२०१५ रोजी झालेल्या सुनावणीत उपरोल्लिखीत निर्देशांनुसार समिती स्थापन करण्याबाबत पृच्छा केली आहे. त्यानुसार अशी समिती

स्थापन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. तद्नुषंगाने शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय:-**

पुणे जिल्ह्यातील पुनर्वसन कामकाजांतर्गत पर्यायी जमीन वाटपाची सद्यस्थिती, पर्यायी जमीन वाटपात उद्भवलेल्या अडीअडचणी व पर्यायी जमीन वाटप अपुर्ण असल्यास त्याबाबतची कारणमिमांसा व उपाययोजना सुचविण्यासाठी पुढीलप्रमाणे समिती नियुक्त करण्यात येत आहे.

१. सचिव (मदत व पुनर्वसन) : अध्यक्ष

२. विभागीय आयुक्त (कोकण विभाग) : सदस्य

२. **<u>समितीची कार्यकक्षा</u> :-** पुणे जिल्ह्यातील पात्र प्रकल्पबाधीत व्यक्तिंना पुनर्वसनांतर्गत देय असलेल्या पर्यायी जमीनीच्या वाटपाची सद्यस्थिती तपासणे, पर्यायी जमीन वाटपातील अडीअडचणीं बाबत तपासणी करणे व आवश्यक त्या उपाययोजना सुचविण्याचे काम ही समिती करील.

३. **<u>कार्यपध्दती</u>** :-समिती आवश्यकतेनुरुप पुणे जिल्ह्यातील वाटपाशी संबधीत अभिलेखांची तपासणी करणे. याचिकाकर्त्यांकडुन निवेदने प्राप्त झाल्यास त्यावर आवश्यकतेनुरुप सुनावणी आयोजीत करणे इत्यादी तसेच आनुषंगीक कामे पुर्ण करुन यथाशीघ्र अहवाल सादर करील.

४. समितीचे कामकाज सुरळीतपणे व कार्यक्षमपणे होण्याच्या दृष्टीने अतिरिक्त जिल्हाधिकारी, पुणे हे समन्वय अधिकारी असतील. त्यांनी समितीच्या निर्देशानुसार समितीस आवश्यक असणारे अभिलेख उपलब्ध करणे, तपासणीसाठी अभिलेख - आकडेवारी सादर करणे, दौरा आयोजीत करणे तसेच सुनावण्या आयोजीत करणे, इत्यादी कामे करावीत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०८२९१५१७३१६५१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pravin R Mundhe

Digitally signed by Pravin R Mundhe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Pravin R Mundhe
Date: 2015.08.29 15:22:41 +05'30'

**( प्र.रा.मुंढे )**

**कार्यासन अधिकारी**

**प्रत,**

१. मा. मंत्री (मदत व पुनर्वसन) यांचे खाजगी सचिव

२. मा. राज्यमंत्री (मदत व पुनर्वसन) यांचे खाजगी सचिव
३. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, यांचे स्वीय सहाय्यक
४. मा. सचिव (मदत व पुनर्वसन) यांचे स्वीय सहाय्यक
५. विभागीय आयुक्त, कोकण विभाग, कोकण
६. उप सचिव (पुनर्वसन), महसुल व वन विभाग, मंत्रालय
७. जिल्हाधिकारी, पुणे
८. अप्पर जिल्हाधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय, पुणे
९. जिल्हा पुनर्वसन अधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय, पुणे
१०.प्रबंधक, मा. उच्च न्यायालय, मुंबई
११.निवड नस्ती, कार्यासन र-४ म. व व. वि. मंत्रालय.